**केंद्र पुरस्कृत सुदूर संवेदन व भौगोलिक माहिती प्रणाली तंत्रज्ञानाचा वापर करण्याच्या योजनेचे सन २०१०-२०११ च्या दुस-या हप्त्याचे अनुदान वितरित करण्याबाबत......**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग,**
**शासन निर्णय क्र. केंपुयो- २०१०/प्र.क्र.६६ /जल-८**
**मंत्रालय, मुंबई -४०००३२**
**दिनांक - २७ जानेवारी, २०११.**

**वाचा :**

१) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. मृदसं-२००७/प्र.क्र.५३/जल-८, दि.१९.९.२००७,
२) केंद्रीय कृषि मंत्रालयाचे पत्र क्र.६-३/२०१०-एम.एम. दिनांक ११ जून,२०१०.
३) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. असक-२०१०/प्र.क्र.४३/जल-११, दि. २४ मे, २०१०.
४) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. केंपुयो-२०१०/प्र.क्र.६६/जल-८, दि. १८ ऑगस्ट, २०१०.
५) केंद्रीय कृषी मंत्रालयाचे पत्र क्र.६-६/२०१०-एम.एम, दि. १६ डिसेंबर,२०१०
६) संचालक (मृदसंधारण), पुणे यांचे पत्र जा.क्र.मृदसं/ सुदूर संवेदन/१० -११/अनु -वित २/३४७८/१०, दि. २९ डिसंबर. २०१०.

**प्रस्तावना :-**

पाणलोट क्षेत्र विकासात सुक्ष्म नियोजनाला अनन्य साधारण महत्व आहे. पाणलोटांच्या सर्व घटकांचा एकत्रित विचार करून नियोजन केल्यास उपलब्ध नैसर्गिक साधनसंपत्तीचा सुयोग्य वापर होऊन उत्कृष्ट परिणाम साध्य होऊ शकतो. पाणलोट विकासाचा प्रकल्प अहवाल तयार करतांना विविध नकाशांचा प्रभावी वापर करण्यासाठी भौगोलिक माहिती प्रणालीचा वापर केल्यास नियोजनामध्ये अचूकता आणणे शक्य आहे. या प्रणालीद्वारे केवळ विविध नकाशांचे एकत्रिकरण नव्हे तर शेतकऱ्यांशी संबंधीत माहिती एका ठिकाणी साठवून सदर माहितीचे विश्लेषण, विविध योग्य लाभार्थींची निवड, सुयोग्य पीक रचना ठरविणे, निरनिराळे अहवाल तयार करणे इत्यादी कामे करणे शक्य आहे. या प्रणालीला सुदूर संवेदन तंत्राची योग्य जोड दिल्यास उपग्रहाद्वारे घेतलेल्या छायाचित्रांच्या माध्यमातून पाणलोट विकासाचे मूल्यमापन, विविध पिकाखालील क्षेत्राचा आणि संभाव्य उत्पादनाचा अंदाज घेणे इ. कामे कमी वेळात व कमी श्रमात होऊ शकतात. या संदर्भात सुदूर संवेदन व भौगोलिक माहिती प्रणालीचा वापर करण्याच्या दृष्टीने शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. संकीर्ण-२००५ /प्र.क्र.१३६/जल-८, दि.१२.८.२००५ अन्वये मान्यता दिली आहे.

२. १०० टक्के केंद्र शासन पुरस्कृत पाणलोट विकास कार्यक्रमांतर्गत सुदूर संवेदन व भौगोलिक माहिती प्रणाली तंत्रज्ञानाचा वापर करण्याच्या योजनेअंतर्गत १० व्या पंचवार्षिक योजनेच्या कालावधीमध्ये एकूण रु.१०५.०० लक्ष खर्च झाला आहे. सन २००९-१० या आर्थिक वर्षासाठी पाणलोट विकास कार्यक्रमांतर्गत सुदूर संवेदन व भौगोलिक माहिती प्रणाली तंत्रज्ञानाचा वापर करण्याच्या योजनेसाठी एकूण रु.४.०० लक्ष निधीच्या कार्यक्रमास मान्यता देण्यात आली होती.

३. केंद्र शासनाने संदर्भाधीन दिनांक ११ जून,२०१० च्या पत्रान्वये सुदूर संवेदन व भौगोलिक माहिती प्रणाली तंत्रज्ञानाचा वापर करण्याच्या योजनेसाठी सन २०१०-११ करीता वर्कप्लॅननुसार एकूण **रु.१०.०० लक्ष (रुपये दहा लक्ष फक्त)** इतक्या निधीच्या कार्यक्रमास मान्यता दिलेली आहे. सन २०१०-११ करीता केंद्र शासनाने दिलेली मान्यता लक्षात घेऊन पाणलोट विकास कार्यक्रमांतर्गत सुदूर संवेदन व भौगोलिक माहिती प्रणाली तंत्रज्ञानाचा वापर करण्याच्या योजनेची

अमंलबजावणी करण्यासाठी वर नमूद दिनांक १८ ऑगस्ट, २०१० च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात आली असून पहिल्या हप्त्याचा रु. ४.०० लाख निधी वितरीत करण्यात आला आहे. या योजनेच्या दुस-या हप्त्याचे अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सन २०१०-११ च्या आर्थिक वर्षाकरिता **पाणलोट विकास कार्यक्रमांतर्गत सुदूर संवेदन व भौगोलिक माहिती प्रणाली तंत्रज्ञानाचा वापर** या योजनेची अंमलबजावणी करण्यासाठी केंद्रीय कृषि मंत्रालयाने दि. ११ जून,२०१० च्या पत्रान्वये **रु.१०.०० लक्ष (रुपये दहा लक्ष फक्त)** च्या कार्यक्रमास मान्यता दिली असून चालू आर्थिक वर्षी अपेक्षित खर्चाचा बाबनिहाय तपशील खालीलप्रमाणे आहे:-

| अ.क्र. | बाब | खर्च (रुपये लक्ष) |
|---|---|---|
| १ | क्षेत्रिय स्तरावर अधिकारी /कर्मचारी यांचे प्रशिक्षण | २.०० |
| २ | सॉफ्टवेअर देखभाल व दुरुस्ती | ३.२५ |
| ३ | आयुक्त व विभागीय स्तरावरील कक्षासाठी आकस्मिक खर्च | ४.७५ |
| | **एकूण** | **१०.००** |

**२.** केंद्र शासनाने दिलेल्या मान्यतेच्या अधिन राहून वर नमूद दिनांक १८ ऑगस्ट, २०१० च्या शासन निर्णयान्वये पाणलोट विकास कार्यक्रमांतर्गत सुदूर संवेदन व भौगोलिक माहिती प्रणाली तंत्रज्ञानाचा वापर या योजनेस राज्य शासनाची प्रशासकीय आणि वित्तीय मान्यता देण्यात आली असून मंजूर झालेल्या रु.१०.०० लक्ष निधीपैकी पहिल्या हप्त्याची रु.४.००लक्ष निधी वितरीत करण्यात आला आहे. उर्वरीत दुस-या हप्त्याची **रु. ६.०० लक्ष (रुपये सहा लक्ष फक्त)** इतका निधी वितरीत करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

**३.** उपरोक्त निधी खर्च करण्यासाठी आयुक्त (कृषि),महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या अधिनस्त ठेवण्यात येत आहे. तसेच संबंधित जिल्ह्यांना निधीचे वितरण करण्यासाठी त्यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. आयुक्त ( कृषि ) यांनी संबंधीत जिल्हयांना निधी उपलब्ध करुन देताना केंद्र शासनाने पाणलोट विकास कार्यक्रमांतर्गत सुदुर संवेदन व भौगोलिक माहिती प्रणाली तंत्रज्ञानाचा वापर करण्याच्या योजनेकरीता विहित केलेल्या मार्गदर्शक सूचना आणि अटी व शर्तीच्या अधीन राहून सदर प्रकल्प/कार्यक्रमासाठी संबंधीत जिल्ह्यांना निधीचे वाटप करावे व त्याकरिता आवश्यक मार्गदर्शक सूचना निर्गमित कराव्यात. सदर निधी संगणक वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात येत असून तो मंजूर मासिक खर्च विवरणपत्राप्रमाणे खर्च करण्यात यावा.

तसेच या योजनेचा भौतिक आणि आर्थिक प्रगती अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासन व राज्य शासनास सादर करावा. या योजनेचा मासिक खर्चाचा प्रगती अहवाल प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत शासनास सादर करावा.

**४.** या बाबतचा खर्च सन २०१०-११ च्या अंदाजपत्रकामध्ये खाली नमूद केलेल्या लेखा शिर्षाखाली मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा आणि त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. हा खर्च करताना विहित केलेल्या कॅशफ्लो (मासिक निधी विवरणपत्र) नुसार हा निधी खर्च करण्याची दक्षता घेण्यात यावी.

**" मागणी क्र एल-७, ४४०२ -मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च १०२ - मृदसंधारण, (०१) राज्य योजनांतर्गत योजना - पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - (०१) (११ ) राष्ट्रीय पाणलोट विकास कार्यक्रम (१००% केंद्र पुरस्कृत) (४४०२१०३२) ५३, मोठी बांधकामे "**

... ३

५. हा शासन निर्णय केंद्रीय कृषि मंत्रालयाचे संदर्भाधीन पत्र दिनांक ११ जून,२०१० व दिनांक १६ डिसेंबर, २०१० तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१६/११/ अर्थसंकल्प - १७, दि. १३ जानेवारी, २०११ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०११०१२७१८१६४०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( वि. रा. ठाकूर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,
मा.मंत्री (जलसंधारण) यांचे खाजगी सचिव,
मा.राज्यमंत्री (जलसंधारण) यांचे स्वीय सहाय्यक,
मा.उपाध्यक्ष, जलसंधारण सल्लागार परिषद यांचे स्वीय सहाय्यक,
आयुक्त ( कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे -४११ ००१.
संचालक ( मृदसंधारण ), कृषि आयुक्तालय, पुणे-४११ ००१.
महालेखापाल -१/२, महाराष्ट्र राज्य ,मुंबई/नागपूर . ( लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता ).
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखापरीक्षा, अधिकारी, मुंबई.
विभागीय कृषि सहसंचालक, सर्व.
जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी, सर्व.
जिल्हा कोषागार अधिकारी, सर्व.
सर्व अधिकारी, ग्रा.वि.व ज.सं.वि., मंत्रालय, मुंबई.
नियोजन विभाग / वित्त विभाग, मंत्रालय , मुंबई.
अवर सचिव (२-अे) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय , मुंबई.
कार्यासन क्रमांक जल-११, ग्रा.वि.व ज.सं.विभाग, मंत्रालय,मुंबई.
जल-८ (निवडनस्ती) ग्रा.वि.व ज.सं.विभाग, मंत्रालय,मुंबई .